**ई-डिस्ट्रिक्ट प्रकल्पांतर्गत सेतु महाराष्ट्र सोसायटीस सहाय्यक अनुदान मंजुर करणेबाबत**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक मातंसं २०११/प्रक्र२२८/का३९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक २९ जुलै, २०११

**प्रस्तावना**:-

राष्ट्रीय ई-गव्हर्नन्स योजनेखाली ई-डिस्ट्रिक्ट हा एक मिशन मोड प्रकल्प आहे. राज्य शासनाच्या माहिती तंत्रज्ञान पायाभुत सुविधेचा पुरेपुर वापर करणे आणि नागरिकांना सामुहिक केंद्रीभुत सुविधा देणे हे ई-डिस्ट्रिक्ट चे उद्दिष्ट आहे.

या योजने अंतर्गत सुरवातीला मिळकतीचे प्रमाणपत्र, रहिवास, जन्म-मृत्यु दाखला इत्यादी सारख्या सेवा देण्यात येणार आहेत.

हा प्रकल्प प्रायोगिक तत्वावर पुणे, नागपुर, लातुर, नांदेड, सिंधुदुर्ग या पाच जिल्हयात राबविण्यात येणार आहेत. त्यातील त्रृटी, उणिवा दूर करुन तो संपूर्ण राज्यभर राबविण्यात येणार आहे.

महाराष्ट्र शासनाने सन २०११-१२ साठी ई-डिस्ट्रिक्ट प्रकल्पासाठी रु. २० कोटी निधी उपलब्ध करुन दिला आहे.

**शासन निर्णय**:-

वरील सर्व बाबींचा साकल्याने विचार करुन शासन असा निर्णय घेत आहे की, सन २०११-१२ या अर्थिक वर्षासाठी राज्य योजनांतर्गत रु. १२.१० कोटी (रु. बारा कोटी दहा लक्ष फक्त) एवढा निधी ई-गव्हर्नन्स प्रकल्प रार्बविण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या सेतु महाराष्ट्र या सोसायटीच्या स्वतंत्र खात्यात जमा करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. याबाबतचा धनादेश सेतु महाराष्ट्र यांचया नांवे काढण्यात यावा.

२. सदर निधी सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील माहिती तंत्रज्ञान संचालनालयास नेमुन दिलेले लेखाशिर्ष मागणी क्र. ए-४ २०५२,सचिवालय सर्वसाधारण सेवा (००)(११)ई-गव्हर्नन्सचे प्रकल्प राबविण्यासाठी सेतु महाराष्ट्र संस्थेला सहाय्यक अनुदान, ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (२०५२०५८२) याखाली खर्ची टाकण्यात यावा व तो वित्तीय वर्ष २०११-१२ साठी मंजूर केलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा. वरील लेखा शिर्षातर्गत मंजूर सहाय्यक अनुदान (रु. १२.१० कोटी) (रु. बारा कोटी दहा लक्ष फक्त) अधिदान व लेखा कार्यालयातुन काढण्यासाठी **श्री. सु. ह. जाधव, उप सचिव तथा संचालक (मातं) यांना नियंत्रण अधिकारी व श्रीमती स्मि. सं. परुळेकर, कक्ष अधिकारी** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०११०८०११२८४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**(प्र. गि. चव्हाण)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत,
मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
महालेखापाल-१( लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्यं,मुंबई / नागपूर
महालेखापाल-१( लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर
उपमहासंचालक, विशिष्ठ ओळख प्राधिकरण क्षेत्रिय कार्यालय, मुंबई
अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
शासनाचे मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव
विकास आयुक्त,उद्योग/ सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व महानगरपालिका आयुक्त
वित्त विभाग, कार्यासन अर्थसंकल्प-१४, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती कार्या-३९